**राज्य स्वातंत्र्य सैनिक निवृत्ती वेतनधारकांची प्रदाने कोषागारांमार्फत करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः स्वासैनि २०१३/प्र.क्र.२१६ / स्वासैक १**

मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई ४०० ०३२
तारीख: १० डिसेंबर,२०१४

वाचा

१) **शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-पीओएस-१०८३/ एफएफसेल, दिनांक २२ जुलै १९८६**

२) **शासन परिपत्रक क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग क्रमांक- स्वासैक- २०१३/प्र.क्र. २१६/ स्वासैक-१, दिनांक २१ फेब्रु. २०१४**

## शासन निर्णय

राज्यात, सन १९६५ पासून स्वातंत्र्य सैनिक सन्मान निवृत्तीवेतन योजना राबविण्यात येत असून स्वातंत्र्यसैनिकांना जिल्हाधिकारी कार्यालयामार्फत निवृत्तीवेतन अदा केले जात होते. शासन निर्णय दिनांक २२ जुलै, १९८६ नुसार बँकेमार्फत निवृत्तीवेतन घेण्यास इच्छुक असलेल्या स्वातंत्र्य सैनिकांना बँकांमार्फत निवृत्तीवेतन घेण्याचा पर्याय देण्यात आला. शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की-

**(१)** दि.१.४.२०१५ पासून राज्यातील राज्य स्वातंत्र्य सैनिक निवृत्तीवेतनधारकांना स्वातंत्र्य सैनिक सन्मान निवृत्तीवेतन व अन्य सवलतींबाबतची प्रदाने कोषागारांमार्फतच करण्यात यावीत. दि.१ एप्रिल, २०१५ नंतर कोणत्याही परिस्थितीत अशी प्रदाने जिल्हाधिकारी कार्यालये अथवा थेट बँकांद्वारे करण्यात येऊ नयेत.

**(२)** परिणामी सर्व संबंधित बँकानी तसेच जिल्हाधिकारी कार्यालयांनी त्यांच्याकडील राज्य स्वातंत्र्य सैनिक निवृत्तीवेतन प्रदान आदेशांच्या मूळ प्रती ( Original PPO) जिल्हा कोषागार कार्यालयांकडे तात्काळ सुपूर्द कराव्यात. संबंधित बँकांकडे अथवा जिल्हाधिकारी कार्यालयाकडे निवृत्ती वेतन प्रदान आदेशांच्या (PPO) मूळ प्रती उपलब्ध नसल्यास त्यांनी सोबत जोडलेल्या विहित नमून्यातील प्रमाणपत्र कोषागार कार्यालयास सादर करावे.

२. कोषागारांमार्फत निवृत्तीवेतनधारकाची प्रदाने करण्याबाबत काय कार्यवाही करावी याबाबत स्वतंत्र परिपत्रकाद्वारे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येतील. तसेच तदनुषंगाने आयोजित करावयाचा प्रशिक्षणाचा कार्यक्रमसुध्दा स्वतंत्ररित्या कळविण्यात येईल

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२१११६४२४८६००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Marutrao Deshpande

Digitally signed by Shrikant Marutrao Deshpande
DN: c=IN, o=All India Services, ou=IAS, postalCode=110001, st=New Delhi, cn=Shrikant Marutrao Deshpande
Date: 2014.12.11 16:50:45 +05'30'

**(श्रीकांत देशपांडे)**
**सचिव व विचौअ-१**

**प्रत,**

१. सर्व विभागीय आयुक्त,
२. सर्व जिल्हाधिकारी,महाराष्ट्र राज्य,
३. सर्व संबंधित बँका (जिल्हाधिकारी कार्यालयामार्फत)
४. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. सह संचालक (सुधारणा), लेखा व कोषागार संचालनालय, नविन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मुंबई ३२.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
८. निवड नस्ती (स्वासैक- १).

# <u>प्रमाणपत्र</u>

श्री. ................ ....(संपूर्ण नाव).......... , राहणार ......... (पूर्ण पत्ता).............. हे या बँकेकडून/ जिल्हाधिकारी कार्यालयाकडून स्वातंत्र्यसैनिक निवृत्तीवेतन घेत आहेत. दि.१.४.२०१५ पासून त्यांची निवृत्तीवेतनादी सर्व प्रदाने कोषागार कार्यालयामार्फत करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. तथापि श्री.....................(संपूर्ण नाव)................. यांच्या निवृत्तीवेतन प्रदान आदेशाची मूळ प्रत (original PPO) या कार्यालयात तात्काळ आढळून येत नसल्याने, असे प्रमाणित करण्यात येते की, श्री. .................... (संपूर्ण नाव)................. हे सध्या दरमहा रु.१०,०००/- (रुपये दहा हजार फक्त) इतके स्वातंत्र्यसैनिक निवृत्तीवेतन घेत आहेत.

ठिकाण:- अधिका-याचे नाव :-

दिनांक :- हुद्दा:-

कार्यालयाचा पत्ता:-

शिक्का :-